गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ७४ पदांना दि.०१/०९/२०२२ ते दि.२८/०२/२०२३ पर्यंत चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: मुदतवाढ - २०२३/प्र.क्र.१४३/२०२३/मोप्र-२**

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दिनांक : ५ /०४/२०२३

वाचा:- १. शासन निर्णय क्र.गोविमं १०९७/(२९०/९७)-जसंअ, दि.२९/०८/१९९८.

२. जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र. आढावा-१००२/(३३५/२००२)/आ(प्रशि), दि.०६/०२/२००३

३. जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.आढावा-२०१६/प्र.क्र.१७५/२०१६/आ(प्रशि), दि.३०/११/२०१६.

४. जलसंपदा विभाग, शासन निर्णय आढावा -२०१८/ प्र.क्र.४५/२०१८/ आस्था.(पुनर्रचना), दि.१०/०१/२०१९.

५. जलसंपदा विभाग ,शासन निर्णय क्र-मुदतवाढ.२०२२/(३८४)/प्र.क्र.१ ६५-मोप्र/२, दि.२०/०६/२०२२.

६. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक:पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि. १८.०८.२०२२.

७. गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळऔरंगाबाद कार्यालयाचे पत्र , आ/गोमपाविम.क्र - /१७५१०.दि , २३. ८.२०२२.

**प्रस्तावना:-**

जलसंपदा विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ ते ४ येथील शासन निर्णयान्वये कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद कार्यालयातील मंजूर असलेल्या नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांची निर्मिती सुधारीत आकृतीबंधानुसार निश्चित करण्यात आली आहे. सदर पदांना खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे संदर्भ क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

| कार्यालयाचे नाव | नियत अस्थायी आस्थापना | मुदतवाढ कालावधी |
|---|---|---|
| कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद. | ७४ पदे | दि.०१/०३/२०२२ ते दि.३१/०८/२०२२ |

संदर्भ क्र.६ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतिबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात

असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१/०९/२०२२ ते दि.२८/०२/२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याचे प्राधिकार देण्यात आले आहेत.

संदर्भ क्र.७ येथील प्रस्तावास अनुसरून, सदर पदांना दि. ०१/०९/२०२२ ते दि.२८/०२/२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णयः-</u>**

गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद कार्यालयाच्या संदर्भ क्र.७ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार सोबतच्या परिशिष्ट - -अ॰ मध्ये दर्शविल्याप्रमाणे कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ७४ पदांना (परिशिष्ट-अ) संदर्भ क्र.६ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार, दि. ०१/०९/२०२२ ते दि. २८/०२/२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यास खालील अटींच्या अधिन राहून मंजूरी देण्यात येत आहे.

१) उपरोक्त सर्व पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.
२) रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदे कर्मचारी कार्यरत असे पर्यंत चालू राहतील.
३) सदर पदे आकृती बंधानुसार मंजुर असतील.
४) उपरोक्त पदांपैकी कोणतेही पदे व्यपगत झालेली नसतील.
५) यानंतर शासनास सादर करण्यात येणारे विहित प्रपत्र प्रमाणपत्र त्या त्या कालावधीच्या दिनांकासहीत प्रस्ताव विहित प्रपत्र, प्रमाणपत्रासह, रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवरील पदांचे नावे व सेवानिवृत्तीच्या दिनांकसह सादर करण्यात यावेत.

२. सदर पदांच्या वेतनासाठी लागणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व त्याखालील मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**नियत अस्थायी आस्थापना :-**

मागणी क्रमांक आय -५,
४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च ,
(८०) सर्वसाधारण,
(१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांतील गुंतवणूका,
(०४) विविध पाटबंधारे विकास महामंडळांना भाग भांडवली अंशदान (वेतन),
(०४)(०५) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (अनिवार्य)
(४७०१ आय २०४).

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्र.पदनि २०१६/ प्र.क्र.८ /१६ / आ.पु.क., दि. १८.८.२०२२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०४१२१५४९०२०९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

ABHAY KESHAORAO YEDSIKAR

Digitally signed by ABHAY KESHAORAO YEDSIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=5724dd2e45895f7c2ab554c8d0b0041f388e5f397467c37bb907e6cc635bd0fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5B9CED1C6530163B6C7A287499C459AF544860D5330D82DBE50D22D67820C373, cn=ABHAY KESHAORAO YEDSIKAR
Date: 2023.04.12 15:54:52 +05'30'

**(अभय येडसीकर)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र : परिशिष्ट -अ॰**

**प्रत सहपत्रासह,**

१. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
४. मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, औरंगाबाद.
५. अधीक्षक अभियंता, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.

यांना कळविण्यात येते की, प्रस्तुत शासन निर्णयान्वये मंजुरी दिलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्या व्यतिरिक्त इतर अधिकारी/कर्मचारी यांची वेतन व देयके अदा केल्यास तसेच या शासन निर्णयान्वये दिलेल्या मंजूरीचा प्रत्यक्ष/अप्रत्यक्ष चुकीचा अर्थ लावून अन्य अधिकारी/कर्मचारी यांची वेतन देयके अदा केल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी आहरण व संवितरण अधिका-यांवर राहील. त्याचप्रमाणे अस्थायी पदांना मुदतवाढ देत असताना, वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयातील सूचना/अटींची पूर्तता होत असल्याबाबत खातरजमा करण्याबाबतची जबाबदारी आहरण व संवितरण अधिका-यांवर राहील.

६. वित्त विभाग ( व्यय-१२), मंत्रालय, मुंबई.
७. कार्यासन आ-(प्रशि) /अर्थ-१/आस्था. (पुनर्रचना), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. मोप्र-२ कार्यासन, जलसंपदा विभाग, निवडनस्ती.

**परिशिष्ट-अ**

**शासन निर्णय क्र. मुदतवाढ-२०२३/(८६६)/प्र.क्र.१४३/मोप्र-२, दिनांक ५/०४/२०२३ चे सहपत्र.**
**दि. ०१/०९/२०२२ ते दि. २८/०२/२०२३ या कालावधीसाठी नियत अस्थायी आस्थापनेवरील ७४ पदे**

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | अ.क्र. | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १.० | **कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद** | १ | कार्यकारी संचालक | १ |
| | | २ | मुख्य लेखा व वित्त अधिकारी | १ |
| | | ३ | अधीक्षक अभियंता | १ |
| | | ४ | लेखा अधिकारी | १ |
| | | ५ | उप अभियंता/सहाय्यक कार्यकारी अभियंता/सहाय्यक अभियंता श्रेणी-१/उप विभागीय अभियंता/उप विभागीय अधिकारी | २ |
| | | ६ | सहायक अभियंता श्रेणी-२/शाखा अभियंता/ कनिष्ठ अभियंता | ८ |
| | | ७ | स्थापत्य अभियांत्रिकी सहायक | ८ |
| | | ८ | सहायक लेखा अधिकारी | ३ |
| | | ९ | प्रथम लिपिक | १ |
| | | १० | वरिष्ठ लिपिक | ८ |
| | | ११ | कनिष्ठ लिपिक/ लिपिक-नि-टंकलेखक / टंकलेखक | १७ |
| | | १२ | अनुरेखक (आरेखक श्रेणी-३) | २ |
| | | १३ | लघु टंकलेखक/निम्न श्रेणी लघुलेखक | १ |
| | | १४ | वाहन चालक | ४ |
| | | १५ | शिपाई | १३ |
| | | १६ | चौकीदार | ३ |
| | | | **एकुण** | **७४** |

***************